**सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, चर्नी रोड, मुंबई या इमारतीचे आराखडे शासनस्तरावरुन स्वाक्षरीत करण्याकरिता सहसचिव/ उपसचिव (महाविद्यालयीन शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांना प्राधिकृत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. बैठक-२०२४/प्र.क्र.१२/मशि-३,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २७ जून, २०२४.

**संदर्भ :-** शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.मभाभ-२०२३/प्र.क्र.१०७/भाषा-१, दि.१५/१२/२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भिय दिनांक १५/१२/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मराठी भाषा विभाग व उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडील भुखंडाबाबत अंशत: अदलाबदल करुन भुखंडाच्या पुढील बाजूस मराठी भाषा भवन व मागील बाजूस सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय अशा दोन स्वतंत्र इमारतीचे बांधकाम करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर प्रकल्पाकरीता मे.पी.के.दास अँड असोसिएट्स, मुंबई यांची वास्तुविशारद म्हणून मराठी भाषा विभागामार्फत नियुक्ती केली आहे.

वास्तूविशारद यांच्याकडून वेळोवळी सादर करण्यात येणारे सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय,मुंबई या इमारतीचे आराखडे स्वाक्षरीत करण्याकरीता विभागातील सहसचिव/उपसचिव (महाविद्यालयीन शिक्षण) यांना प्राधिकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिनस्त सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय,मुंबई या इमारतीचे वास्तुविशारद यांच्याकडून माहे फेब्रुवारी, २०२४ व त्यापुढील काळात सादर करण्यात येणारे आराखडे शासनामार्फत स्वाक्षरीत करण्याकरीता सहसचिव/उपसचिव (महाविद्यालयीन शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.तथापि, संबंधित नकाशे/आराख़डे यांना सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या स्तरावर मान्यता घेणे आवश्यक राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०६२७१४४१४१९४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR

Digitally signed by HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=284A4236AE7795D36DD2ECB5AC6CA70C333A3CF1B13F66828D224AE2026B37E9, cn=HEMANTKUMAR PANDHARINATH BAVISKAR
Date: 2024.06.27 14:53:23 +05'30'

**( हे. पं. बाविस्कर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. संचालक,उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई.
९. विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, मुंबई विभाग, मुंबई.
१०. अधिक्षक, सावित्रीदेवी फुले महिला छात्रालय, चर्नी रोड, मुंबई
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. वित्त विभाग, व्यय-५, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. नियोजन विभाग, कार्यासन-१४७१, मंत्रालय, मुंबई-३२
१४. सार्वजनिक बांधकाम विभाग, कार्यासन-इमा-३, मंत्रालय,मुंबई-३२.
१५. अवर सचिव (साशि-१/मशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. निवड नस्ती (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.